**ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (खुद्द) साठी लागणाऱ्या वस्तूंची खरेदी करण्यासाठी मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (खुद्द) खरेदी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-०२२३/प्र.क्र.५/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २ मार्च, २०२३.

**वाचा :-**

शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग III/उद्योग-४, दि.०१ डिसेंबर, २०१६.

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाने संदर्भाधीन दि.१ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये “शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारित नियमपुस्तिका” निर्गमित केलेली आहे. सदर नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक २.९.३ मध्ये मंत्रालयीन प्रशासकीय विभागासाठी (खुद्द) खरेदी समितीची रचना दिलेली आहे. ई गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत सचिवांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात आली आहे. विभागास लागणारी संगणक सामग्री व इतर अनुषंगीक वस्तुंची खरेदी प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या मान्यतेने करण्यात येते. परंतु ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत Gem पोर्टलव्दारे किंवा दरपत्रक मागवून खरेदी केलेल्या वस्तुंच्या तांत्रिक निविदा व आर्थिक निविदा तपासणी आवश्यक असते यासाठी संबंधित सह/उप सचिव यांच्या अध्यक्षतेखाली खरेदी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्य शासनाच्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीच्या सुधारित नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक २.९.३ मधील तरतूदीनुसार शालेय शिक्षण व क्रीडा विभागासाठी (खुद्द) खालीलप्रमाणे मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (खुद्द) खरेदी समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १. | संबंधित कार्यासनाचे सहसचिव/उपसचिव | अध्यक्ष |
| २. | उद्योग संचालनालयाचे प्रतिनिधी | निमंत्रीत |
| ३. | लेखा व कोषागरे संचालनालयाचे प्रतिनिधी | निमंत्रीत |
| ४. | अवर सचिव/कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) | सदस्य |
| ५. | अवर सचिव/कक्ष अधिकारी (रोख शाखा) | सदस्य |
| ६. | संबंधित कार्यासनाचे अवर सचिव/कक्ष अधिकारी | सदस्य |

२. सदर समितीने विभागासाठी आवश्यक खरेदी करतांना संदर्भाधीन दिनांक ०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीच्या नियमपुस्तिकेतील तरतुदीनुसार सर्व प्रक्रिया पुर्ण करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०२१३०४४७७६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2023.03.02 13:08:12 +05'30'

**(विवेक सपकाळ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
४) संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) संचालक, लेखा व कोषागरे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
8) निवडनस्ती/ संगणक.